क्रमांक- ससप ११०८/प्र.क्र.१९२/०८/१४
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- १/६/ २००९

**आदेश**

खाली नमूद केलेल्या उप सचिवांना त्यांच्या नावासमोर स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या दिनांकापासून सह सचिव पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना ते सध्या कार्यरत असलेल्या विभागात सह सचिव पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व जाती प्रवर्ग | सध्याचा विभाग | सहसचिव पदावरील पदोन्नतीचा दिनांक |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्रीमती शा.स.काद्री | अ.वि.वि. | २७.०५.२००९ |
| २ | श्री.म.दि.आडिवरेकर | न.वि.वि. | ३०.०५.२००९ |
| ३ | श्री.पं.वि.भोईर | ज.सं.वि. | १.०६.२००९ |
| ४ | श्री.अ.से.धांडे | म.व व.वि. | १.०६.२००९ |
| ५ | श्री.आ.बा.पाटील | कृ. व पदुम वि. | १.०६.२००९ |

२. सदर पदोन्नती मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक १३१२/१९९८ वरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३. उपरोक्त अधिका-यांच्या पदोन्नतीचे आदेश त्यांना वयाच्या ५०/५५ व्या वर्षापलिकडे शासन सेवेत ठेवण्याविषयीच्या सर्वसाधारण आदेशांच्या अधीन असतील.

४. उपरोक्त पदोन्नत अधिका-यांनी त्यांच्या वेतन निश्चितीसंबंधीचा विकल्प या आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत द्यावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास त्यांची वेतन निश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११ (१) (एक) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन केली जाईल.

५. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०६०११६१९०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-
**(वि.ग.दळवी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
प्रधान सचिव (सेवा) सा.प्र.वि.
अ.मु.स./ प्रधान सचिव /सचिव,अ.वि.वि./न.वि.वि./ज.सं.वि./म.व व.वि./कृ. व पदुम वि.
सह/उप सचिव (आस्थापना), अ.वि.वि./न.वि.वि./ज.सं.वि./म.व व.वि./कृ. व पदुम वि.
संबंधित अधिकारी,
सा.प्र.वि./का.१३,
निवडनस्ती